**राज्यातील सहकारी साखर कारखान्यांचा आकृतीबंध निश्चित होईपर्यंत कोणत्याही प्रकारची नोकरभरती न करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन परिपत्रक क्र. ससाका-२०१९/प्र.क्र.२६०/२५-स,**
मंत्रालय, विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०३.०१.२०२०

**शासन परिपत्रक**

राज्यातील सहकारी साखर कारखान्याचा अधिकारी/ कर्मचारी यांचा आकृतिबंध कसा असावा याबाबत साखर आयुक्त यांनी साखर संचालक ( प्रशासन ) यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत केली असून समितीने सादर केलेल्या अहवालाच्या अनुषंगाने आकृतिबंध निश्चित करण्याचे काम प्रगतीपथावर आहे.

२. राज्यातील बहुसंख्य साखर कारखाने हे आर्थिकदृष्ट्या अडचणीत असून उस उत्पादक शेतकऱ्यांच्या FRP ची रक्कम वेळेत देणेही अडचणीचे ठरत आहे. तसेच काही कारखान्याच्या निवडणुका येत्या काळात होणार आहेत. त्यामुळे कारखान्याच्या प्रशासकीय खर्चावर नियंत्रण ठेवणे आवश्यक झालेले आहे. आणि म्हणून राज्यातील सहकारी साखर कारखान्याचा आकृतिबंध निश्चित होवून त्यास शासनाची मान्यता मिळेपर्यंत राज्यातील कोणत्याही सहकारी साखर कारखान्याने कोणत्याही प्रकारची नोकर भरती करू नये.

३. साखर आयुक्त, पुणे यांनी वरील निर्देश सर्व संबंधितांच्या व साखर कारखान्याच्या निदर्शनास आणावेत आणि त्याची काटेकोरपणे अंमलबजावणी होईल याची दक्षता घ्यावी.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०२००१०३१२३०२८९००२ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pramod Mankoji Valanj

Digitally signed by Pramod Mankoji Valanj
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation, Marketing and Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9e7fafe78ccbad1148295b75b2b4a0fc30e01ea267cb61e5d741e2bf211f323, cn=Pramod Mankoji Valanj
Date: 2020.01.03 12:13:01 +05'30'

**( प्रमोद मा. वळंज )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

**प्रत,**

१. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्य मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. सर्व सहकारी साखर कारखाने (साखर आयुक्त यांच्यामार्फत)
६.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य, सहकारी साखर कारखाना संघ लि.मुंबई.
७. विशेष लेखा परिक्षक सहकारी संस्था (साखर) सर्व
८.सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर)
९. महासंचालक, वसंतदादा शुगर इन्स्टिट्युट, मांजरी, पुणे
१०. निवडनस्ती - (२५-स.)